महिला व बाल विकास आयुक्तालय व एकात्मिक बाल विकास सेवा योजना आयुक्तालयातंर्गत गट अ संवर्गात पदोन्नती देण्याकरीता पदोन्नती समिती गठीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक. मबाआ २०२२/प्र.क्र.१६/का.७
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- १५ फेब्रुवारी, २०२२.

वाचा:- १. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र एसआरव्ही-१०७६/१०, दि १६ मार्च, १९७६
२. महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र. मबाआ २०१५/प्र.क्र.२६/का.७, दि.४ सप्टेंबर, २०१५.
३. सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.एसआरव्ही-२०२१/प्र.क्र.४४/का-१२,दि.२ ऑगस्ट, २०२१.

**शासन निर्णय:-**

सदर प्रकरणी शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-१०७६/१०, दि. १६ मार्च १९७६ मध्ये दिलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार महिला व बाल विकास विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील शासन सेवेतील क्षेत्रीय स्तरावर कार्यरत असलेले अधिकारी/कर्मचारी यांना पात्रतेच्या अधिन राहुन पदोन्नती अनुज्ञेय ठरविण्यासाठी वाचा क्र.२ अन्वये विभागीय पदोन्नती समिती गठीत करण्यात आली होती.

२. वाचा क्र.३ येथील पत्रान्वये सामान्य प्रशासन विभागाने प्रशासकीय विभागीय स्तरावर गठीत करण्यात आलेल्या विभागीय पदोन्नती समितीमध्ये उपसचिव (सेवा) यांची सदस्य म्हणून नेमणूक न करण्याबाबत कळविले आहे.

तसेच ज्या विभागीय पदोन्नती समितीमध्ये उपसचिव (सेवा) यांना सदस्य म्हणून नेमले आहे, त्यांनी उप सचिव (सेवा) यांचे नाव वगळून, सदर समितीची रचना सुधारीत करून तसे आदेश निर्गमित करावेत, असे कळविले आहे.

३. त्यानुसार वाचा क्र. २ येथील शासन निर्णय अधिक्रमित करून महिला व बाल विकास विभागच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील शासन सेवेतील क्षेत्रीय स्तरावर कार्यरत असलेले अधिकारी यांना पात्रतेच्या अधिन राहून गट-अ संवर्गात पदोन्नती अनुज्ञेय ठरविण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या वाचा क्र.१ येथील शासन परिपत्रकानुसार महिला व बाल विकास विभागामध्ये विभागीय पदोन्नती समिती गठित करण्यात येत आहे. या समितीमध्ये या विभागातील खालील अधिकाऱ्यांचा समावेश राहील.

| | | |
|---|---|---|
| १. | सचिव/प्रधान सचिव/अ.मु.स., महिला व बाल विकास | अध्यक्ष |
| २. | आयुक्त, महिला व बाल विकास पुणे | सदस्य |
| ३. | सह सचिव/उप सचिव, महिला व बाल विकास | सदस्य |
| ४. | सह सचिव/उप सचिव (क्षेत्रिय आस्थापना), महिला व बाल विकास | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| **५.** | **कक्ष अधिकारी/अवर सचिव, महिला व बाल विकास** | **सदस्य (मागासवर्गीय प्रतिनिधी)** |
| **६.** | **कक्ष अधिकारी/अवर सचिव (क्षेत्रिय आस्थापना), महिला व बाल विकास** | **सदस्य सचिव** |

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१५१२२४२५२१३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA T BHALWANE

Digitally signed by RAJENDRA T BHALWANE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d2758148ccaa24d1fb27b9df, serialNumber=badfc0daa40cc485400aad9ceabcd514095659a6cdfac856815518dcd188c23a, cn=RAJENDRA T BHALWANE
Date: 2022.02.16 11:42:26 +05'30'

**( रा. ता. भालवणे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त,महिला व बाल विकास,पुणे.
२. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, यांचे स्वीय सहायक.
३. सामान्य प्रशासन विभाग (का-१२) , मंत्रालय, मुंबई ४०००३२ यांना माहितीसाठी.
४. सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय मुंबई ४०००३२.
५. निवड नस्ती.